**सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण करण्यासाठी कर्मचारी वर्ग अस्थाई पदे दि.०१.१०.२०१६ ते दि. २८.०२.२०१७ पर्यंत चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुदवा-२२१६/प्र.क्र.३४/९-स,**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
तारीख :- २५ ऑक्टोबर, २०१६

<u>वाचा</u>

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची पत्रे.
अ.क्र.आस्थापना/कक्ष-१/मुळा प्रवरा इले./मुदतवाढ/२०१६, दि.२०.८.२०१६,
अ.क्र.आस्थापना/कक्ष-१/८३/जंकाससं/मुदतवाढ/२०१६, दि. १८.८.२०१६
अ.क्र.आस्थापना/कक्ष-१/बलुतेदार/मुदतवाढ/२०१६,दि.२०.८.२०१६.
अ.क्र.आस्थापना/कक्ष-१/चंद्रपूर जं.का.सं./मुदतवाढ/२०१६, दि. १८.८.२०१६,
अ.क्र. अस्थापना/कक्ष-१/कृषी प्रक्रीया संस्था/मुदतवाढ/२०१६, दि. २०.८.२०१६.

२) शासन निर्णय क्रमांकः राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स, दि. ०५ मे, २०११.

३) शासन निर्णय क्रमांकः मुदवा-२२१५/प्र.क्र.३४/९-स, दि.६ मे २०१६

४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२१ सप्टेंबर, २०१६

<u>प्रस्तावना</u>

सतत व समवर्ती योजनेंतर्गत मंजूर असलेली अस्थायी पदे सन २०१६-१७ करीता पुढे चालू ठेवण्याबाबत (Continuation Of Temporary Posts) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयाने वरील संदर्भ १ येथील ५ पत्रांन्वये प्रस्ताव सादर केलेले आहेत. सदर प्रस्तावातील तक्त्यात दर्शविण्यात आल्यानुसार योजनानिहाय एकूण ६५ अस्थायी पदे दि.०१.०३.२०१६ ते दि.३०.९.२०१६ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यासाठी वाचा क्रमांक ३ दिनांक ६ मे २०१६ च्या शासन निर्णयान्वये पुढे चालू ठेवली होती.

**०२.** संदर्भ-२ येथील शासन निर्णयान्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या अधिनस्त क्षेत्रिय कार्यालयातील स्थायी / अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार एकूण ९,३१९ पदांच्या सुधारीत आकृतीबंधास मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्र शासनाच्या ९७ व्या घटनादुरुस्तीच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये आवश्यक त्या सुधारणा करुन सुधारीत अधिनियम दि.१३.०८.२०१३ रोजी जारी करण्यात आला आहे. सदर सुधारीत अधिनियमातील तरतुदीनुसार लेखापरिक्षण विभागाची पुर्नरचना करणे आवश्यक आहे. सदर बाबींस काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. ही बाब विचारात घेता विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या एकूण ६५ पदांना दि.०१.१०.२०१६ पासून पुढील कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय

**०३.** शासन याबाबतीत आता पुढील प्रमाणे आदेश देत आहे :-

(१) सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण करण्यासाठी खालील तक्त्यांत दर्शविण्यात आलेल्या ५ योजनांवरील एकूण ६५ अस्थायी पदांना संदर्भ क्र.३ अन्वये दि.३०.९.२०१६ पर्यंत पूढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आलेली होती. वित्त विभाग शासन निर्णय दि.२१.९.२०१६ मध्ये नमुद केल्यानुसार सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था पुणे यांच्या ६५ अस्थायी पदांच्या आकृतीबंधास दि. ३१ डिसेंबर २०१६ पर्यन्त उच्च स्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक आहे.परंतु आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना ते दि.२८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना दिले आहेत. त्यामुळे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्रमांक १ मधील पत्रान्वये शिफारस केलेल्या ६५ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१६ ते दि.२८.२.२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. मुदतवाढ दिलेल्या ६५ पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| अ. क्र. | योजनेचे नांव | अस्थाई पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांच्या सांविधानिक लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग. | ३२ |
| २ | गट पातळीवरील ग्रामीण कारागिरांची बहुउद्देशिय सहकारी संस्था (बलुतेदार) लेखापरीक्षण. | ११ |
| ३ | मुळा प्रवरा इलेक्ट्रिक को. ऑप. सोसायटी लि. श्रीरामपूर, जि. अहमदनगर या संस्थेचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण. | ०३ |
| ४ | जंगल कामगार सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण. | १६ |
| ५ | चंद्रपूर जिल्ह्यातील जंगल कामगार सहकारी संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षण. | ०३ |
| | एकूण:- | ६५ |

(२) वरील निरनिराळया पांच योजनांवरील एकूण ६५ अस्थाई पदांचा तपशिल परिशिष्ट अ, ब, क, ड व इ मध्ये दर्शविण्यात आलेला आहे. वर नमूद केलेल्या विवरणपत्रातील अ. क्र. १, ३, ४ व ५ येथील पदांवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करीता मंजूर करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक :- व्ही-२**

**मुख्य लेखाशिर्ष:- २४२५, सहकार**

**उपलेखाशिर्ष:- १०१,सहकारी संस्थांची लेखापरीक्षा ,**

**गौणशिर्ष:- (०१) (०१) लेखापरीक्षेसाठी कर्मचारी वर्ग - (२४२५०२२७)**

(३) तसेच उपरोक्त विवरणपत्रातील अ.क्र. २ वरील बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक:- व्ही-२**

**मुख्य लेखाशिर्ष :- २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग**

**उपलेखाशिर्ष :-११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघु उद्योग आणि सहकारी संस्था,**

**गौणशिर्ष:- (०१) (०२) गट पातळीवरील ग्रामीण कारागीर (बलुतेदार) - (२८५१ ००२ १)**

(४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वेतन व भत्त्याच्या रक्कमेत चालू वर्षाच्या खर्चात (२०१६-१७) १.५% बचत होईल असे पहावे. सदर पदे सहा महिन्यापेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त असल्यास अशी पदे वगळण्यात यावीत. तसेच लेखापरीक्षण शुल्काची वसूली पूर्णत: होईल, अशी दक्षता घ्यावी आणि लेखापरीक्षण शुल्क वसुलीच्या मर्यादेतच आस्थापना खर्च करावा.

(५) सदरचे आदेश शासन निर्णय क्र.वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ वित्तीय सुधारणा-१, दि. २१.९.२०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२५१५२७५४६९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra S Pujari

Digitally signed by Mahendra S Pujari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Assistant, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahendra S Pujari
Date: 2016.10.26 14:09:44 +05'30'

**महेंद्र पुजारी**
कक्ष अधिकारी

सोबत :- परिशिष्ट अ, ब, क, ड व इ.

**प्रत,**

१. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव,

२. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,

३. मा. मंत्री(सर्व) यांचे खाजगी सचिव,

४. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,

५. मा. विधीमंडळ सदस्य (सर्व),

६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.

७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

८. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.

९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.

१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

११.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१३.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१४.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१५.साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१६.संचालक, वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१७.संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१८.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.

१९.मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळ, फोर्ट,मुंबई-०१.

२०.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन / लेखापरीक्षण).

२१.सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,

२२.सर्व जिल्हा विशेष लेखापरीक्षक, सहकारी संस्था,

२३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२४.कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२ / वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२५.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४६३) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२६.कक्ष अधिकारी (५-स, १२-स, १६-स, १७-स, २१-स, २२-स व रोख शाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

२७.निवड नस्ती / (९-स).

**शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक :-मुदवा-२२१६/प्र.क्र.३४/९-स**

**दिनांक:- २५ ऑक्टोबर, २०१६ चे सहपत्र**

**परिशिष्ट - अ.**

**०१.योजनेचे नाव :-कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांचे वैधानिक लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग.**

| अ. क्र. | पदनाम | एकूण पदे | जिल्हयाचे नाव | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | ठाणे | रायगड | नाशिक | धुळे | सांगली | बीड | नागपूर | भंडारा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-२ | ४ | १ | १ | ० | १ | ० | ० | १ | ० |
| २ | लेखापरिक्षक श्रेणी-१ | ३ | १ | ० | ० | ० | १ | १ | ० | ० |
| ३ | लेखापरिक्षक वर्ग-२ | २ | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | १ |
| ४ | उपलेखापरिक्षक | ४ | १ | १ | ० | १ | ० | ० | १ | ० |
| ५ | कनिष्ठ लिपिक | १२ | ३ | २ | १ | २ | १ | १ | १ | १ |
| ६ | शिपाई | ७ | २ | ० | १ | १ | ० | १ | १ | १ |
| एकूण पदे:- | | ३२ | ८ | ४ | ३ | ५ | २ | ३ | ४ | ३ |

..........................................................................

## परिशिष्ट - ब.

०२.योजनेचे नांव :- गट पातळीवर ग्रामीण कारागिरांच्या बहुउद्देशिय (बलुतेदार) सहकारी संस्थांच्या लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग.

| अ. क्र. | पदनाम | जिल्हयाचे नाव | पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | लेखापरीक्षक | पुणे | १ |
| २ | | कोल्हापूर | १ |
| ३ | | नागपूर | १ |
| ४ | | वर्धा | १ |
| ५ | | औरंगाबाद | १ |
| ६ | | परभणी | १ |
| ७ | | बीड | १ |
| ८ | | नाशिक | १ |
| ९ | | जळगांव | १ |
| १० | | अहमदनगर | १ |
| ११ | | रत्नागिरी (चिपळूण) | १ |
| एकूण:- | | | ११ |

***************************************************************************

## परिशिष्ट - क.

०३. योजनेचे नांव :-मूळा प्रवरा सहकारी संस्था, अहमदनगर या सस्थेच्या लेखापरीक्षणाकरीता कर्मचारी वर्ग.

| अ. क्र. | पदनाम | पदे | जिल्हा |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरीक्षक वर्ग-२ | १ | अहमदनगर |
| २ | उपलेखापरीक्षक | १ | |
| ३ | कनिष्ठ लिपिक | १ | |
| एकूण :- | | ३ | |

*******************************************************************

**परिशिष्ट - ड.**

०४.योजनेचे नाव :-जंगल कामगार सहकार संस्थांचे सतत व समवर्ती लेखापरीक्षणाकरीता कर्मचारी वर्ग.

| अ. क्र. | पदनाम | एकूण पदे | जिल्हयाचे नाव | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | ठाणे | नाशिक | धुळे | नांदेड | नागपूर | चंद्रपूर | अमरावती | यवतमाळ |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** | **११** |
| १ | लेखापरिक्षक श्रेणी-१ | ३ | १ | ० | ० | ० | १ | १ | ० | ० |
| २ | कनिष्ठ लिपिक | ८ | २ | १ | १ | १ | १ | १ | १ | ० |
| ३ | शिपाई | ५ | ० | १ | ० | ० | १ | १ | १ | १ |
| | एकूण पदे:- | १६ | ३ | २ | १ | १ | ३ | ३ | २ | १ |

..................................................................

**परिशिष्ट - इ.**

०५.योजनेचे नांव :- चंद्रपूर जिल्हयातील जंगल कामगार सहकारी संस्थांच्या सतत व समवर्ती लेखापरीक्षणाकरीता कर्मचारी वर्ग.

| अ. क्र. | पदनाम | पदे | जिल्हा |
| --- | --- | --- | --- |
| १ | लेखापरीक्षक श्रेणी-२ | १ | चंद्रपूर |
| २ | कनिष्ठ लिपिक | १ | |
| ३ | शिपाई | १ | |
| | एकूण :- | ३ | |